**विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती व नाशिक करीता यंत्रसामग्री खरेदी करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१७/प्र.क्र. १६६/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: २७ ऑक्टोंबर, २०२०.

संदर्भ-

१) सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-३/टे-३/विसंसेरु/खरेदी/१७-१८/७७३५-३७/२०, दि. ९.१०.२०२०.
२)शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र-खरेदी/२०१७/प्र.क्र.१६६/ दि..३१.१.२०१८.
३)शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी/२०१७/प्र.क्र.१६६/ दिनांक १७.६.२०१९.
४) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी/२०१९/प्र.क्र.९३/ दिनांक १८.९.२०१९
५) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी/२०१७/प्र.क्र.१६६/ दिनांक ९.१.२०२०.
६) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र-खरेदी/२०१९/प्र.क्र.९३/ दिनांक ३१.३.२०२०
७) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र, खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

प्रस्तावना -:

विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती व नाशिककरीता यंत्रसामग्री खरेदी करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय अ.क्र.२, ३, ४, ५ व ६ अन्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. त्यानुसार रुपये ६१,५२,९६,७२९/-इतका निधी हाफकीन महामंडळ, मुंबई यांचेकडे वर्ग केला असून, त्या निधीमधून खरेदी करण्यात येणार आहे.

प्रशासकिय मान्यता देताना यंत्रसामुग्री खरेदीचे दर अंदाजित होते, आता टाटा मेमोरियल संस्थेव्दारे निविदा प्रक्रिया करून दर ठरविण्यात आले असून अंदाजित दरापेक्षा वाढीव दर प्राप्त झालेले आहेत. त्या वाढीव दरानुसार टाटा मेमोरियल संस्थेकडून हाफकीन महामंडळामार्फत यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय-:

सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक ९.१०.२०२० च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानूसार विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय,

अमरावती व नाशिक करीता खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या यंत्रसामुग्रींची खरेदी करण्यासाठी टाटा मेमोरियल संस्थेव्दारे निश्चीत केलेल्या दरानुसार हाफकीन महामंडळ, मुंबई यांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वर्ग केलेल्या निधीमधून रुपये ५३,११,०९,४६०/- (रु.त्रेपन्न कोटी अकरा लाख नऊ हजार चारशे साठ फक्त) इतकी रक्कमेची सुधारीत प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे. तसेच बाब क्र.४ येथील खरेदी हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई यांच्याव्दारे निविदा प्रक्रिया करून खरेदी करण्यात यावी. तसेच पतपत्र (LC) ज्या दिवशी उघडण्यात येईल त्या दिवसाची डॉलरची किंमत जेवढी असेल त्याप्रमाणे गणना करुन Advance Digital Liner Accelerator + External RT Treatment Planning System + Networking व High Dose rate remote after loading Brachytherpy Unit या बाबी निविदाकारास अदा करण्यात याव्यात.

| अ.क्र. | यंत्राचे नांव | प्रशासकिय मान्यता देतानाचे दर (प्रती नग)(रुपये) | प्रत्यक्ष किंवा टाटा मेमोरियल रुग्णालयाने निश्चित केलेले दर (प्रतीनग) | खरेदी करावयाची संख्या | टाटा मेमोरियल रुग्णालयाने निश्चित केलेल्या दरानुसार एकुण-किंमत |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Advanced Digital Liner Accelerator + External RT Treatment Planning System + Networking | 11,00,00,000/- | रु.16,62,63,200/- | 2 नग | रु 33,25,26,400/- |
| 2 | High Dose rate remote after loading Brachytherpy Unit | 3,00,00,000/- | रु 3,82,91,530/- | 2 नग | रु 7,65,83,060/- |
| 3 | Physics Dosimetry + Mould Room Equipment | 2,00,00,000/- | रु 2,10,00,000/- | 2 नग | रु 4,20,00,000/- |
| 4 | C.T. Scanner & Virtual Simulation System | 4,00,00,000/- | --- | 2 नग | रु 8,00,00,000/- |
| | एकुण- | | | | **रु 53,11,09,460/-** |

**अटी :-**

१) सदरहू यंत्रसामुग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर यंत्रसामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे टाटा मेमोरियल संस्थेव्दारे निविदा प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला आहे.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खाजरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती व नाशिक करिता खरेदी करावयाची यंत्रसामुग्री हाफकीन जिव औषध निर्माण महामंडळ यांच्याकडे वर्ग केलेल्या सन २०१७-१८ व २०१८-१९ मध्ये लेखाशिर्ष-कमांक -४२१० ११२८ अंर्तगत ५२-यंत्रसामुग्री व साधन सामुग्री अनुदानातून खरेदी करण्यात यावी.

८) सदर यंत्रसामुग्रीच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

११) दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

**उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.**

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२७१५५२३३७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.10.27 16:56:04 +05'30'

(ज.स.तडवी)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) अधिक्षक, विभागिय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)